मा. न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, सांगली यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कौटुन्या-११२०/२३८/प्र.क्र.४१/का-९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १४ मार्च, २०२०

**वाचा :-** १. शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्र.कौटुंन्या-१११६/प्र.क्र.२२२/का-९, दि.१८.०८.२०१७.
२. विधि व न्याय विभाग अधिसूचना क्र.FMC-१११६/C.R.२२२/D-IX, दि.२१.०१.२०२०.
३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. B(W)A-६८०४/१९९२/३८७/७०२८, दि.२६.०२.२०२०

**प्रस्तावना:-**

कौटुंबिक न्यायालय अधिनियम, १९८४ च्या कलम ३ अन्वये मा. उच्च न्यायालयाच्या सहमतीने शहरी/नागरी प्रदेशाकरिता कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्याची तरतूद आहे. त्यानुसार संदर्भीय क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सांगली नगरपालिकेच्या हद्दीतील क्षेत्रासाठी कौटुंबिक न्यायालय स्थापन करण्यात आले. संदर्भ क्र. २ येथील शासन अधिसूचनेनुसार सदर न्यायालय दि.०८.०२.२०२० रोजीपासून कार्यान्वित झाले असून सदर न्यायालयातील मा. न्यायाधीश यांना आहरण व संवितरण अधिकार प्रदान करणेबाबत संदर्भ क्र. ३ येथील प्रस्तावान्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी विनंती केली आहे. त्यानुसार मा. न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, सांगली यांना आहरण व संवितरण अधिकार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कौटुंबिक न्यायालय, सांगली करीता "मागणी क्र. जे-१, २०१४-न्यायदान,(दत्तमत), १०२ उच्च न्यायालये (१३) १४ व्या वित्त आयोगांतर्गत योजना (१३)(०२) कौटुंबिक न्यायालये (अनिवार्य) सांकेतांक क्रमांक (२०१४ ०६०१)" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या वर्षाकरीता आवश्यक अनुदान मंजूर करण्यात आले आहे.

२. मा. न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, सांगली यांना महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम १५ (३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन सदर न्यायालयाचे आहरण

व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१६१७२४०८१५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.03.16 17:27:36 +05'30'

**( उदय बा. शुक्ल )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति:-**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२. महालेखापाल -एक व दोन (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर .
३. मा. प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, सांगली.
४. मा. न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, सांगली
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
६. विधि व न्याय विभाग कार्या. २३/२४/२५
७. वित्त विभाग - व्यय ५
८. निवडनस्ती / कार्यासन - ९.